ठेव स्वरुपातील बांधकामे हाती घेण्याबाबत सविस्तर सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्र. बीडीजी २०१७/प्र.क्र.५०/इमारती-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०६/०४/२०१७

**शासन परिपत्रक:-**

ठेव स्वरुपातील बांधकामे हाती घेण्याबाबत महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेमधील परिच्छेद क्रमांक २९९ ते ३०५ कार्यपद्धती विहित करण्यात आली आहे. सदर कार्यपद्धतीचे पालन क्षेत्रिय स्तरावर काटेकोरपणे होत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे.

२. ठेव स्वरुपातील कामांची अंमजबजावणी व त्यावर नियंत्रण ठेवण्याच्या दृष्टीकोनातून सदरील कामे कार्यान्वित करण्यास क्षेत्रिय स्तरावर खालीलप्रमाणे सविस्तर सूचना निर्गमित करण्यात येत आहेत :-

१) ठेव स्वरुपातील बांधकामे सा.बां. विभागाकडून हाती घ्यावयाची असल्यास सा.बां. नियमपुस्तिका परिच्छेद ३०० मध्ये नमूद परिशिष्ट ४२ अन्वये दिलेल्या अधिकारानुसार सक्षम प्राधिकाऱ्याची पूर्वपरवानगी प्राप्त करुन हाती घ्यावीत. सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्व परवानगीशिवाय कार्यकारी अभियंता यांनी ठेव रक्कम स्विकारु नये.

परिशिष्ट ४२ अ.क्र. ३३ नुसार ठेव घेऊन करावयाची कामे स्वीकारण्यास सक्षम प्राधिकारी

| **सक्षम प्राधिकारी** | **कामाची किंमत** |
|---|---|
| कार्यकारी अभियंता | रुपये १०.०० लक्ष पर्यंत |
| अधीक्षक अभियंता | रुपये १०.०० लक्ष पेक्षा जास्त परंतु रुपये २५.०० लक्ष पर्यंत |
| मुख्य अभियंता | रुपये २५.०० लक्ष पेक्षा जास्त (पूर्ण अधिकार) |

२) सदरील कामांना सक्षम प्राधिकारी यांची मंजूरी प्राप्त झाल्यावर सदर कामांना खालील सूचनांनुसार उपभोक्ता विभागनिहाय जॉब क्रमांक देण्यात यावे :-

जॉब क्रमांक : Y/

| a | b | c | d | e |
|---|---|---|---|---|

Y - उपभोक्ता विभागाचे नाव (जसे गृह विभाग, विधी व न्याय विभाग, सार्वजनिक आरोग्य विभाग इ.)

a - प्रस्ताव प्राप्त झाल्याचे वर्ष

b - जिल्हा

c - त्या जिल्हयातील विभागाचे नाव ( विभागाचे नांव ओळखण्यासाठी सा.बां/वि.प्र/रोहयो/ एकात्मिकृत/अन्य)

d - सदर काम ज्या स्तरावर काम मंजूर करण्यात आले त्या प्राधिकरणाचा स्तर (जसे मु.अ., अ.अ., का.अ. )

e - जॉब क्रमांक ००१ ते ९९९

वरीलप्रमाणे सांकेतांक देण्याची पद्धत ही मुख्य अभियंता, अधीक्षक अभियंता तसेच कार्यकारी अभियंता स्तरावर प्रत्येक उपभोक्ता विभागनिहाय जसे आरोग्य, गृह इ. मंजूर करावयाच्या कामासाठी समान राहील.

३) उपभोक्ता विभागाकडून सदर कामांबाबत पूर्वमान्यता प्राप्त करुन घ्यावी. अंशदान ठेव पध्दतीने सा.बां.विभागाने कार्यान्वित करावयाच्या कामांबाबत, म.सा.बां.नियमावली १९८४ (सहावी आवृत्ती) च्या परिच्छेद २९९ ते ३०५ नुसार सदरील मान्यतेमध्ये खालील अटींचा अंतर्भाव असावा. सदर मान्यता झाल्याखेरीज निविदा प्रक्रिया सुरु करण्यात येऊ नये.

(अ) सदर ठेव कामावरील खर्च हा निविदा निश्चितीनंतर प्राप्त निविदेतील किंमतीच्या अनुषंगाने ( कमी/अधिक देकारानुसार ) करारनाम्याच्या अटी व शर्तीनुसार, कामावर देय भाववाढ, फरक इ. गृहित धरुन काम पूर्ण झाल्यावर अंतिम खर्च विभागाद्वारे वेळोवेळी उपभोक्ता विभागास कळविण्यात येईल.

सदर अंतिम खर्च हा ठेव रकमेपेक्षा जास्त असल्यास उपभोक्ता विभागास उर्वरित रक्कम विहित कालावधीत सा.बां. विभागाकडे जमा करणे बंधनकारक राहील. जर ठेव रक्कम ही अंतिम प्रकल्प खर्चापेक्षा कमी असल्यास सा.बां. विभागातर्फे उर्वरित रक्कम उपभोक्ता विभागास परत करण्यात येईल.

(ब) ठेव रक्कम विहित कालावधीत प्राप्त न झाल्यास काम सा.बां. विभागातर्फे सुरक्षित स्थितीत थांबविण्यात येईल. सा.बां. विभाग उर्वरित कामाबाबत कुठलेही दायित्व स्वीकारणार नाही. तसेच निधी न उपलब्ध झाल्यामुळे प्रकल्प किंमतीत होणारी वाढ तसेच अपूर्ण कामास होणारे नुकसान यांस सा.बां. विभाग जबाबदार राहणार नाही.

(क) सदर कामावर होणाऱ्या खर्चाबाबत ठेव रक्कमेच्या अधीन राहून उपयोगिता प्रमाणपत्र तसेच तिमाही मध्ये कार्यकारी अभियंता उपभोक्ता विभागास सादर करेल.

(ड) कामावर होणाऱ्या अतिरिक्त खर्चाबाबत उपभोक्ता विभागास वेळोवेळी अवगत करण्यात येईल व ठेव रकमेपेक्षा जास्त होणारा खर्च चालू राहण्याबाबत वित्त विभागाची मंजूरी मिळविण्याची जबाबदारी ही प्रशासकीय विभागाची राहील.

(इ) बांधकाम पार पाडण्यासंदर्भातील शासनाच्या (सा.बां.विभागाची) जबाबदारीची मर्यादा, ज्यांच्यासाठी बांधकाम करावयाचे आहे त्या उपभोक्ता विभागातील अधिका-यांनी व ज्यांच्याकडे ते बांधकाम सोपविण्यात येणार असेल, त्या सा.बां. विभागाच्या यंत्रणेने पूर्णपणे जाणून घ्यावी. बांधकाम पार पाडण्याच्या ओघात करावा लागणारा सर्व खर्च मग तो बांधकामाशी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे संबंधित असला तरीही बांधकामाच्याच खर्चातून करण्यात येईल हे स्पष्टपणे विनिर्दिष्ट करावे.

(ई) बांधकाम खूप मोठे असेल किंवा बांधकामासंबंधात कायदेशीर सल्ला घेऊन करार करणे इष्ट ठरेल अशी परिस्थिती असेल तर त्याबाबत कायदेशीर सल्ला घेतल्यानंतरच करार करावा.

(उ) संबंधित प्रशासकीय विभागाकडून लेखी विनंती करण्यात आली तर एका बांधकामासाठीची ठेव जर त्यात बचत झाली असेल तर ती ठेव थकित असलेल्या दुसऱ्या बांधकामा संबंधीतील खर्च भागविण्यासाठी वापरता येईल. बांधकाम प्रगतीत असताना व्याप्तीत बदल अथवा वाढ संभवत असल्यास, प्रशासकीय मान्यता प्रदान करणा-या प्राधिकरणाने केलेल्या विनंतीनुसारच असे बदल कार्यान्वीत करण्यात येतील. तसेच तांत्रिक मंजूरीच्या वावात बदल होत असल्यास, तांत्रिक मंजूरी प्रदान करणा-या प्राधिका-यापेक्षा वरच्या दर्जाच्या प्राधिकरणाची पूर्वसंमती व मंजूरी घेणे अपरीहार्य राहील. याकरिता मुख्य अभियंता हे सर्वोच्च तांत्रिक अधिकारी असतील.

४) ठेव स्वरुपाच्या बांधकामामुळे निर्माण होणारे कोणतेही दायित्व पत्करण्यापूर्वी ठेव रक्कम उपभोक्ता विभागाकडून प्राप्त करुन घेण्यात यावी. जर आवश्यक असेल त्यावेळी निधी मिळू शकेल अशी उपभोक्ता/सा.बां. विभागाची खात्री असेल तर, त्याबाबतीत निश्चित तारखांना/वेळापत्रकानुसार उचित हप्त्यावर देय रक्कमेच्या प्राप्तीबाबत प्राधिकारपत्र संबंधित विभागाने देणे बंधनकारक राहील.

५) प्रादेशिक विभागातील सर्व विभागांनी त्यांचे अधिनस्त सुरु असलेल्या ठेव कामांबाबतची वर्षनिहाय अद्ययावत माहिती विवरणपत्र "ब" मध्ये मंडळास विभागीय लेखाधिकारी व कार्यकारी अभियंता यांच्या प्रमाणपत्रासह दर महिन्याच्या ५ तारखेस मंडळास सादर करावी तसेच मंडळामार्फत संकलित माहिती १० तारखेपर्यंत प्रादेशिक कार्यालयास सादर करावी.

६) विभागीय कार्यालयाद्वारे विवरणपत्र "अ" मध्ये व मंडळ कार्यालयातर्फे विवरण "ब" मध्ये विभागनिहाय गोषवाऱ्यासह प्रादेशिक कार्यालयास सादर करण्यात यावी. उपरोक्त माहिती मंडळाकडून दर महिन्याच्या १० तारखेस प्रादेशिक कार्यालयास सादर करण्यात यावी. मुख्य अभियंता यांनी कामनिहाय माहिती व गोषवारा त्यांचे अभिप्रायासहित शासन सा.बां.विभागास सादर करावा.

७) मंत्रालय स्तरावर ही माहिती संकलन व त्याचे मा.प्रधान सचिवांकडे सादरीकरणाची जबाबदारी व ठेव कामे संनियंत्रण बाबीची जबाबदारी उप सचिव (रा.म) यांची राहील.

वरील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०४०६१५५७१५९११८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सहपत्र :-** विवरणपत्र "अ" व "ब"

Sanjay Uttarwar

Digitally signed by Sanjay Uttarwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DY ENGR AND DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cab21a54ad660ded981a3eca61380e321e245c3a783fe22e29d3e1080185a683, cn=Sanjay Uttarwar
Date: 2017.04.06 15:59:42 +05'30'

**( सं.मु.उत्तरवार )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. अ.मु.स/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
३. प्रधान सचिव (सा.बां)/सचिव (रस्ते)/सचिव (बांधकामे), सा.बां.विभाग, मंत्रालय
४. सर्व मुख्य अभियंते, सा.बां.प्रा.विभाग व (विद्युत) विभाग
५. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र, राज्य, मुंबई
६. सर्व अधीक्षक अभियंते, सा.बां.मंडळ व (विद्युत) मंडळ
७. सर्व कार्यकारी अभियंते,सा.बां.विभाग व (विद्युत) विभाग
८. संचालक, उपवने व उद्याने, मुंबई
९. सह सचिव (सेवा)/उप सचिव (आं.वि.स)/उप सचिव (रस्ते)/उप सचिव (रा.म)/
१०. उप सचिव (इमारती), सा.बां.विभाग, मंत्रालय
११. सर्व अधिकारी व कार्यासन अधिकारी, सा.बां.विभाग, मंत्रालय
१२. निवडनस्ती (इमारती-२ कार्यासन).

**विवरणपत्र- अ**

**ठेव कामांचा तपशील सादर करावयाचे प्रपत्र**

| वर्ष | अ.क्र. | उपभोक्ता विभागाचे नाव | कामाचे नाव | कामाची किंमत | ठेव प्राप्तीचा तपशील | | माहे . वर्ष अखेरचा खर्च (रू लक्ष) | शिल्लक निधी | उपयोगीता प्रमाणपत्र | | कामाची सद्यस्थिती (पूर्ण /प्रगतीत/सुरू नाही) | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | रक्कम (रू लक्ष) | प्राप्तीचा दिनाक | | | दिनाक | रक्कम (रू.लक्ष) | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |

**प्रमाणपत्र**

प्रमाणित करण्यात येते की,विवरणपत्र-अ मध्ये नमूद कामाव्यतिरीक्त ठेव कामे या विभागाकडे घेण्यात आलेली नाही

सही
कार्यकारी अभियंता
**सा बा विभाग**

सही
विभागीय लेखाधिकारी
**सा बा विभाग**

**विवरणपत्र-ब**

**ठेव कामांचा तपशील सादर करावयाचे प्रपत्र**

| वर्ष | सा.बा विभागाचे नाव | उपभोक्ता विभागाचे नाव | एकूण कामे | | आतापर्यंत प्राप्त ठेव रक्कम (रू.लक्ष) | माहे... वर्ष .....अखेरचा खर्च(रू.लक्ष) | कामाची सद्यस्थिती | | | | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | सख्या | किंमत | | | एकूण | पूर्ण | प्रगतीत | सुरू नसलेली | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |
| | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | |

अधिक्षक अभियंता

सा.बां.मंडळ .....